**"अनन्या" या नाटकाच्या अनुदानासाठीच्या प्रयोग सादरीकरणास दोन महिने मुदतवाढ देण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग,**
**शासन निर्णय क्र. नासंअ ४८१८/प्र.क्र.३८४/सां.का.४**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक : ११ जानेवारी, २०१९**

**वाचा :- १)** शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. नानिअ २०१२/ प्र. क्र. २५०/सां.का.४, दिनांक १९ जानेवारी, २०१६
२) सांस्कृतिक कार्य संचालनालयाचे पत्र क्र. सां.का.सं/४०६१, दिनांक ३० डिसेंबर, २०१७

**प्रस्तावना :-**

उपर्निर्दिष्ट दिनांक १९ जानेवारी, २०१६ च्या शासन निर्णयान्वये "नाटयनिर्मिती संस्थांना नाटयप्रयोगासाठी अनुदान मंजूर करणे" या योजनेची सुधारीत नियमावली तयार करण्यात आलेली आहे. त्याअनुषंगाने उपर्निर्दिष्ट दिनांक ३० डिसेंबर, २०१७ च्या सांस्कृतिक कार्य संचालनालयाच्या पत्रान्वये "अनन्या" या नाटकास "अ" दर्जा देण्यात आला आहे. नियमावलीनुसार अनुदानास पात्र झालेल्या नाटकांना पत्राच्या दिनांकापासून १ वर्षाच्या आत नाटयनिर्मिती अनुदान योजनेच्या अटी व शर्तीनुसार १०० प्रयोग सादर केल्याचे पुरावे १०, २५, ४० व २५ या टप्प्यात सादर करावयाचे असतात. तथापि, "अनन्या" नाटकातील मुख्य भूमिका करणा-या अभिनेत्री यांना दुखापत झाल्यामुळे वैद्यकीय सल्ल्यानुसार त्यांना "अनन्या" नाटकाचे प्रयोग करता येणे शक्य झाले नाही. त्यामुळे सुधीर भट थिएटर, मुंबई ही संस्था "अनन्या" या नाटकाचे १०० प्रयोग विहित मुदतीत करण्यास असमर्थ ठरली. तथापि, चांगले नाटक, चांगली संहिता व चांगला अभिनय वाढावा यासाठी संस्थेस नाटक सादरीकरणासाठी अपरिहार्य कारणास्तव झालेला विलंब क्षमापित करुन सदर संस्थेस "अनन्या" या नाटकासाठी मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

सुधीर भट थिएटर, मुंबई यांच्या "अनन्या" या नाटकास "नाटयनिर्मिती संस्थांना नाटयप्रयोगासाठी अनुदान मंजूर करणे" या योजनेखाली अनुदान मिळण्याकरिता १०० प्रयोग सादर करण्यासाठी दिनांक २९ डिसेंबर, २०१८ नंतर २ महिन्याची मुदतवाढ **"विशेष बाब"** म्हणून देण्यात येत आहे.

२. सदर प्रकरण पूर्व उदाहरण म्हणून घेण्यात येऊ नये.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१९०१११४४३२१२०२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Digitally signed by Vilas Ramrao Thorat
Date: 2019.01.11 14:54:32 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
३. उप सचिव (सांस्कृतिक कार्य), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
५. निर्माता, सुधीर भट थिएटर, शिवाजी मंदीर, रुम नं.५, दादर, मुंबई (संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांचेमार्फत)
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८. महालेखापाल-१/२ मुंबई/नागपूर (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य
९. महालेखापाल-१/२ मुंबई/नागपूर (लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य
१०.अवर सचिव, अर्थसंकल्प शाखा, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग
११.निवड नस्ती, सां.का.४